अधिव्याख्याता, विद्युत, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससेनि-३२१८/प्र.क्र.११०/१८/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २० डिसेंबर, २०१८.

**संदर्भ** : १) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.१५ जून, २०१७.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५(२)(३७)/२४२२/सात, दि.०३ जुलै, २०१८.
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई, यांचा दि.१२ जुलै, २०१८ चा ई-मेल.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र.०२ येथील पत्राव्दारे एकूण ३७ उमेदवारांची अधिव्याख्याता, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर नियुक्तीसाठी शिफारस केली आहे. त्यापैकी महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवारांची त्यांच्या नावासमोर रकाना क्र.६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र | गु. क्र | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | १ | श्री. देशमुख अदित्य नारायणराव | इ.मा.व | खुला | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम | -------- |
| २ | २ | श्री.शुक्ला मनिषकुमार लालमन | खुला | खुला | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, मुर्तीजापूर | -------- |
| ३ | ३ | श्री. फुटाणे चेतन सुभाष | खुला | खुला | पुणे | शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर | -------- |
| ४ | ४ | श्री. खामकर हर्षल प्रकाशराव | खुला | खुला | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, खामगांव | -------- |
| ५ | ५ | श्री. अदलिंगे रविराज भारत | इ.मा.व | खुला | पुणे | शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर | -------- |

| अ. क्र | गु. क्र | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ६ | ६ | श्रीमती पाटिल वसुंधरा केशव | खुला | खुला | औरंगाबाद | शासकीय तंत्रनिकेतन, हिंगोली | -------- |
| ७ | ७ | श्री. झाटे गणेश रमेश | इ.मा.व | खुला | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, मुर्तिजापूर | **लातूर येथील चारीत्र्य पडताळणी अहवाल सादर करण्याच्या अटीस अधिन राहून** |
| ८ | ८ | श्री. लोणारकर प्रकाश मधुकरराव | इ.मा.व | खुला | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम | -------- |
| ९ | ९ | श्री. शिंदे गणेश भैरू | खुला | खुला | पुणे | शासकीय तंत्रनिकेतन, अवसरी | -------- |
| १० | १० | श्री. अर्पित जैन | खुला | Against Open Sports | नाशिक | शासकीय तंत्रनिकेतन, नंदुरबार | -------- |
| ११ | ११ | श्री. मेश्राम अजिंक्य विनोद | अ.जा | अ.जा | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, गोंदिया | **नागपूर येथील चारीत्र्य पडताळणी अहवाल सादर करण्याच्या अटीस अधिन राहून** |
| १२ | १२ | श्रीमती शिंदे पुनम माणिक | खुला महिला | खुला महिला | पुणे | शासकीय निवासी महिला तंत्रनिकेतन, तासगांव | -------- |
| १३ | १३ | श्रीमती कोहकडे अनिता रमेश | खुला | खुला महिला | औरंगाबाद | शासकीय तंत्रनिकेतन, नांदेड | -------- |

| अ. क्र | गु. क्र | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १४ | १४ | श्री. चव्हाण ओम शिवलाल | वि.ज (अ) | वि.ज (अ) अनुशेष | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, गोंदिया | -------- |
| १५ | १५ | श्री. बरबडे गणेश मुरलीधर | वि.मा.प्र | वि.मा.प्र | औरंगाबाद | शासकीय तंत्रनिकेतन, नांदेड | **मुंबई येथील चारीत्र्य पडताळणी अहवाल सादर करण्याच्या अटीस अधिन राहून** |
| १६ | १७ | श्री. दांडगे शरद ओंकार | अ.जा | अ.जा | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, ब्रम्हपूरी | **मुंबई येथील चारीत्र्य पडताळणी अहवाल सादर करण्याच्या अटीस अधिन राहून** |
| १७ | १८ | श्रीमती मडके ऐश्वर्या एकनाथ | खुला महिला | खुला महिला | कोकण-१ | शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी | -------- |
| १८ | १९ | श्रीमती अनिमीरेड्डी श्रावंती | खुला महिला | खुला महिला | औरंगाबाद | शासकीय तंत्रनिकेतन, बीड | -------- |
| १९ | २० | श्री.सोळंके सुरज दिलीपराव | अ.ज | अ.ज अनुशेष | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम | **दर्यापूर,अमरावती येथील चारीत्र्य पडताळणी अहवाल सादर करण्याच्या अटीस अधिन राहून** |
| २० | २१ | श्रीमती शिरशिकर प्राची गोपाळ | खुला महिला | खुला महिला | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, आर्वी | -------- |

| अ. क्र | गु. क्र | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| २१ | २२ | श्री. कछियावले कपिल रामेश्वर | भ.ज.(ब) | भ.ज.(ब) अनुशेष | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, गोंदिया | -------- |
| २२ | २४ | श्री. सांगडे अनिकेत विठ्ठल | अ.ज | अ.ज अनुशेष | कोकण-१ | शासकीय तंत्रनिकेतन, विक्रमगड | -------- |
| २३ | २५ | श्री. काळे श्रीधर उध्दवराव (PH) | खुला PH-Locomotor disability or Cerebral palsy | खुला PH-Locomotor disability or Cerebral palsy | पुणे | शासकीय तंत्रनिकेतन, कराड | -------- |
| २४ | २८ | श्री. हापसे माणिक मच्छिंद्र | इ.मा.व PH-Locomotor disability or Cerebral palsy | इ.मा.व PH-Locomotor disability or Cerebral palsy | नाशिक | शासकीय तंत्रनिकेतन, अहमदनगर | **जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून** |
| २५ | २९ | श्री. शिरभाते सुमित अरूण | इ.मा.व PH-Locomotor disability or Cerebral palsy | इ.मा.व PH-Locomotor disability or Cerebral palsy | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, यवतमाळ | --------- |

| अ. क्र | गु. क्र | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| २६ | ३१ | श्री. पवार राहुल चंद्रशेखर | अ.ज | अ.ज (अनुशेष) | नाशिक | शासकीय तंत्रनिकेतन, नंदुरबार | **जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून** |
| २७ | ३२ | श्रीमती वार्डेकर रेणुका शरदराव | अ.ज (महिला) | अ.ज (अनुशेष) | कोकण-१ | शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी | **वैद्यकीय तपासणी अहवाल आणि वाशिम व अमरावती येथील चारीत्र्य पडताळणी अहवाल आणि जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून** |
| २८ | ३३ | श्रीमती राऊत लक्ष्मी मोहन | अ.ज (महिला) | अ.ज (अनुशेष) | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, गोंदिया | --------- |
| २९ | ३५ | श्री. वराडे निखिल सुनिल | भ.ज(ड) PH-Locomotor disability or Cerebral palsy | भ.ज(ड) PH-Locomotor disability or Cerebral palsy | नाशिक | शासकीय तंत्रनिकेतन, जळगांव | --------- |
| ३० | ३६ | श्री. अहिरकर शुभम रामभाऊ | अ.ज | अ.ज (अनुशेष) | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, साकोली | **जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून** |

| अ. क्र | गु. क्र | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ३१ | ३७ | श्रीमती राऊत शितल वसंतराव | अ.ज (महिला) | अ.ज (अनुशेष) | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, आर्वी | --------- |

०२. उपरोक्तपैकी अ.क्र. २७ येथील उमेदवार श्रीमती वार्डेकर रेणुका वगळता इतर सर्व उमेदवारांना संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्टया शासकीय सेवेकरीता पात्र ठरविले आहे. तशी नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी. श्रीमती वार्डेकर रेणुका यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती ), १९८१ मधील नियम ११(१) अन्वये नियुक्तीच्या तारखेपासून त्यांची सहा महिन्यांची सेवा पूर्ण होण्यापूर्वी आरोग्याबद्दलचे वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील, या अटीच्या अधिन राहून नियुक्ती देण्यात येत आहे .

०३. उपरोक्तपैकी अ.क्र.७,११,१५,१६,१९ व २७ येथील श्री. झाटे गणेश , श्री. मेश्राम अजिंक्य,श्री. बरबडे गणेश, श्री. दांडगे शरद, श्री. सोळंके सूरज व श्रीमती वार्डेकर रेणुका या उमेदवाराने सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चारित्र्य-२११७/प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ, दि.२८/८/२०१७ नुसार चारित्र्य व पुर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र नियुक्ती आदेशापासून सहा महिन्यांच्या आत सादर करणे आवश्यक आहे. उमेदवाराने सादर केलेली माहिती असत्य असल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्तीपत्र रद्दबादल करुन भारतीय दंड संहितेनुसार फौजदारी कारवाई तसेच शासन सेवेत कायम स्वरुप अपात्र ठरविण्यात येईल. उर्वरीत उमेदवारांचा चारित्र्य पडताळणी अहवाल व साक्षांकन नमुना पोलीसांकडून प्राप्त झाला असून त्यांच्या विरूद्द कोणताही दंड व शिक्षा असलेबाबतची नोंद आढळून येत नसल्याचे कळविले आहे.

०४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ नुसार उपरोक्त यादीतील अ.क्र.२४,२६,२७ व ३० येथील श्री. हापसे माणिक मच्छिंद्र, श्री. पवार राहुल चंद्रशेखर, श्रीमती वार्डेकर रेणुका शरदराव व श्री. अहिरकर शुभम रामभाऊ या उमेदवारांची त्यांच्या जात वैधता प्रमाणपत्र शिवाय सदर पदावर तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर सदर उमेदवारांनी नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत आपल्या जात प्रमाणपत्राची वैधता संबंधित जात पडताळणी समीतीकडून करुन घेणे आवश्यक राहील. सदर उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सहा महिन्याच्या आत शासनास सादर केले नाही अथवा जात पडताळणी समितीने त्याचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविले तर त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

०५. उक्त नमूद ३१ उमेदवारांची अधिव्याख्याता, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवारांची वेतनश्रेणी रु. १५,६००-३९,१००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/ (३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांना प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिवीक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) शिफारसपात्र अपंग उमेदवाराने सादर केलेले अपंगात्वाचे प्रमाणपत्र आयुक्त, अपंग, महाराष्ट्र राज्य पुणे यांच्याकडून/ संबंधित प्राधिकाऱ्यांकडून पुढील तीन महिन्याचा आत तपासून घेण्यात यावेत.

६) शिफारसपात्र मागासवर्गीय उमेदवाराचे जाती विषयक दावे संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून / संबंधित प्राधिका-याकडून तपासून घेण्यात यावेत

७) सदर उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

८) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

**९) परिच्छेद ०१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी.६७/प्र.क्र.२०७/कार्य-१२,दि.२८मे, २०१८ नुसार सदर विहित कालावधीत उमेदवार रूजु झाला नाही तर तो नोकरीची संधी गमावेल व त्याच्या नियुक्ती करिता विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणा-या कोणत्याही कारणांचा/ विनंतीचा विचार केला जाणार नाही.**

१०)शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्य सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील.दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

११) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१२) उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१३) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०६. उपरोक्त अ.क.१० येथील श्री. अर्पित जैन या उमेदवाराची नियुक्ती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल असलेल्या मुळ अर्ज क्र.६१४/२०१८ या न्यायालयीन प्रकरणावरील अंतिम आदेशाच्या अधिन राहून करण्यात येत आहेत.

०७. सदर उमेदवारांपैकी जे उमेदवार शासकीय सेवेत कार्यरत असतील अशा उमेदवारांचे गोपनीय अहवाल न पाहता त्यांना नियुक्ती देण्यात येत आहे. सदर उमेदवारांचे गेल्या पाच वर्षातील गोपनिय अहवाल तपासण्याची जबाबदारी त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या संस्था प्रमुखांवर सोपविण्यात येत आहे.

०८. प्रस्तुत पदाकरीता आवश्यक असलेल्या शैक्षणिक अर्हतेच्या तरतूदीनुसार उमेदवाराने पदवीस्तरावर किमान प्रथम श्रेणी धारण करणे आवश्यक आहे. तथापी, UGC व AICTE च्या धोरणानुसार काही विद्यापीठे / स्वायत्त संस्थाकडून उमेदवारांना Class ऐवजी Grade देण्यात येते. अशा उमेदवारांची पदवी सेवा प्रवेश नियमानुसार First Class किंवा Equivalent आहे याची खातरजमा संबंधित संस्था प्रमुखांनी करूनच उमेदवारांना रूजू करून घ्यावे.

०९. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

१०. हे आदेश प्राप्त होताच संबंधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबंधित संस्थाप्रमुखांकडे सादर करावा. संस्था प्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१२२०१७३०५९९६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2018.12.20 17:34:48 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित उमेदवार (ई-मेलव्दारे).

**प्रत:**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई.
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
३) मा. मंत्री उच्च व तंत्रशिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री उच्च व तंत्रशिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, उच्च व तंत्रशिक्षण, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).
७) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन,सर्व संबंधित संस्था. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).
(वरील उमेदवारांना रुजु करुन घेताना त्यांच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्था प्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे आणि त्याबाबतचा

अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती अटींच्या अधीन राहून केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटींची पूर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

९) सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (तंत्रशिक्षण संचालनालया मार्फत).

१०) निवड नस्ती (तांशि-७).